2011012016013700।

पिंपरी-चिंचवड महानगरपालिका
पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील
उद्यान अधीक्षक पदाची वेतनश्रेणी सुधारणा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.पीसीसी-३०९१/प्र.क्र.६९/९१/नवि-२२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : ९ एप्रिल, १९९१.

पहा :- १] आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.प्रशासन-१/कावि-११७/९१, दिनांक २०/२/१९९१.

शासन निर्णय :- मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ५१ चे पोटकलम [४] अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून, शासन याद्वारे पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उद्यान अधीक्षक या पदाची वेतनश्रेणी रू. ६००-११५० वरून रू. ६८०-१५०० म्हणजेच सुधारित रू. २२००-४००० अशी सुधारणा करावयाच्या महानगरपालिकेच्या प्रस्तावास मंजुरी देत आहे. तसेच सदर पदाचे अभिनाम "प्रमुख उद्यान अधीक्षक" असे करण्यास मान्यता देत आहे. मात्र सदर पदाची अर्हता खालीलप्रमाणे असेल---

सहायक अधीक्षकांच्या संवर्गात किमान ५ वर्षे सेवा केलेल्या व जिने आपली गुणवत्ता सिध्द केलेली आहे अशा एखाद्या योग्य व्यक्तीस बढती देऊन अथवा---

पुढील उमेदवारांपैकी कोणाचे तरी नामनिर्देशन करून करण्यात येईल---

[एक] अगोदर महानगरपालिकेच्या सेवेत रूजू झालेला नसेल तर त्याचे वय पस्तीस वर्षापेक्षा जास्त नसावे आणि,

[दोन] त्याने कृषिशास्त्राची किंवा उद्यान विद्येची पदवी किंवा वनस्पती शास्त्रातील स्नातकोत्तर पदवी संपादन केलेली असावी आणि---

[तीन] वरील उप-खंड [दोन] मध्ये नमूद केलेली पात्रता संपादन केल्यानंतर किमान पाच वर्षे त्याने प्रसिध्द उद्यानांच्या व उपवनांच्या व्यवस्थापनाच्या व प्रशासनाच्या कामाचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेला असला पाहिजे. पाच वर्षापैकी तीन वर्षे व्यवस्थापनाचा तर दोन वर्षे अशा उद्यानांच्या व उपवनांच्या प्रशासनाचा अनुभव असला पाहिजे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

घ.ज. तलरेजा ९/४/९

[ घ.नं. तलरेजा ]
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त,
पिंपरी-चिंचवड महानगरपालिका,
पिंपरी, पुणे [५ प्रती].